**सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील चारही प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी सायकॅट्रीक औषधे व कापड-चोपडची (लिनन) खरेदी करण्यासाठी लेखाशिर्ष २२१० ०२९१ खाली "२१-पुरवठा व सामुग्री" या उद्दिष्टांतर्गत अर्थसंकल्पीय वितरण (BEAMS) प्रणालीवर निधी वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२४/प्र.क्र.३३ /आरोग्य-८

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २२मार्च,२०२४

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.प्रशामा-१२२३/प्र.क्र.१८८/आरोग्य-८ दि.१२.०९.२०२३
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र.प्रशामा-१२२३/प्र.क्र.१८९/आरोग्य-८ दि.१२.०९.२०२३
४) अतिरिक्त संचालक (मानसिकआरोग्य), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/ माआ/ टे-४/अनुदान उपलब्ध/५०-५२/२३ दिनांक ०२.०१.२०२४
५) अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/माआ/ टे-४/अनुदान उपलब्ध/४८८-९२/२३ दिनांक ०५.०२.२०२४

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील चारही प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी सायकॅट्रीक औषधे व कापड-चोपडची (लिनन) खरेदी करण्यासाठी "लेखाशिर्ष २२१० ०२९१ खाली २१-पुरवठा व सामुग्री" या उद्दिष्टांतर्गत सुधारित अंदाजाच्या अतिरिक्त ३०% (रु.३२३.४० च्या ३० टक्के) म्हणजेच रु.९७.०० लक्ष व "लेखाशिर्ष २२१० ०२१७ खाली २१-पुरवठा व सामुग्री" या उद्दिष्टांतर्गत सुधारित अंदाजाच्या अतिरिक्त ३०% (रु.२०३.९४ च्या ३० टक्के) म्हणजेच रु.४३.०० लक्ष इतका निधी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार अर्थसंकल्पीय वितरण (BEAMS) प्रणालीवर वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील चार प्रादेशिक मनोरुग्णालयांसाठी सायकॅट्रीकची औषधे व कापड-चोपडची (लिनन) खरेदी करण्यासाठी "लेखाशिर्ष २२१० ०२९१ खाली २१-पुरवठा व सामुग्री" या उद्दिष्टांतर्गत रुपये ९७,००,०००/-(अक्षरी रुपये सत्त्यान्नव लक्ष फक्त) आणि "लेखाशिर्ष २२१० ०२१७, २१-पुरवठा व सामुग्री" या उद्दिष्टांतर्गत रुपये ४३,००,०००/- (अक्षरी रुपये त्र्येचाळीस लक्ष फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण (BEAMS) प्रणालीवर वितरीत करुन खर्च करण्यास पुढील अटीं-शर्तीच्या अधिन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

०२. (अ) वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे सहसंचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा, मुंबई यांनी कळविले असून, त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(ब) यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी प्रमाणित केले आहे.

(क) सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणा मार्फत लाभार्थ्याच्या/पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

(ड) सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी प्राधिकरणाच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी प्रमाणित केले आहे.

(इ) सदर अनुदान “सशर्त” असून यापुर्वी शासनाकडुन वितरीत केलेल्या अनुदानाचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता, त्याच प्रयोजनासाठी करण्यात येणार असल्याचे सहसंचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा, मुंबई यांनी प्रमाणित केले आहे. तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.”

(ई) सदर अनुदान दि.३१.०३.२०२४ पुर्वी खर्ची टाकण्यात येईल, याची संपुर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई, व अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य ), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

०३. तसेच सदर खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची व संनियंत्रण करण्याची संपूर्ण जबाबदारी, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई, आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांची राहील.

०४. महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरणाची सहायक अनुदानाची देयके कोषागारातुन आहरीत करुन मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई यांना संवितरीत करण्यासाठी “प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय मुंबई” यांना “आहंरण संवितरण अधिकारी” आणि “सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई” यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

०५. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

०६. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, तसेच, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२०/व्यय-१३, दिनांक ०५.०३.२०२४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२२१२०१३९९४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2024.03.22 15:22:07 +05'30'

**(चंद्रकांत ह. वडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
७) अतिरिक्त संचालक (मानसिक आरोग्य ), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.
९) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.
१०) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
११) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१३) निवडनस्ती (आरोग्य-८)